**डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे विद्यापीठासाठी अत्यावश्यक शैक्षणिक व वैज्ञानिक उपकरणे, विविध यंत्रसामुग्री इ. ची खरेदीच्या अनुषंगाने उर्वरित निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- डीसीयु-२०२३/प्र.क्र.११/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**संदर्भ :-** १. विभागाचे समक्रमांकाचे दि.१५.०२.२०२३ व दि.२७.०६.२०२३ रोजीचे शासन निर्णय.
२. विभागाचा समक्रमांकाचा दि.०५.०७.२०२३ व दि.२९.०१.२०२४ रोजीचा शासन निर्णय.
३. कुलसचिव डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे यांचे दि.२२.०२.२०२४ रोजीचे पत्र.
४. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३.

**प्रस्तावना :-** डेक्कन कॉलेज ही संस्था भारतातील तीन जुन्या संस्थापैकी एक आहे. दि.०६.१०.१८२१ रोजी हिंदू कॉलेज नामक संस्था म्हणून अस्तित्वात आली. या संस्थेच्या विविध विभागांना उपकरणे व यंत्रसामुग्रीची खरेदी करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये रु.९,३३,९६,९५०/- इतक्या किंमतीच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये वरील खरेदी प्रक्रिया करण्यासाठी रु.६,५०,००,०००/- एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. आता उर्वरित खरेदीच्या अनुषंगाने उर्वरित निधी वितरीत करण्याची संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. सदर विनंतीस अनुसरुन वित्त विभागाने निधी वितरीत करण्यास मान्यता दिल्यानुसार डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे विद्यापीठासाठी अत्यावश्यक शैक्षणिक व वैज्ञानिक उपकरणे, विविध यंत्रसामुग्री इ. ची खरेदीच्या अनुषंगाने उर्वरित निधी विद्यापीठास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे येथील पुरातत्वशास्त्र विभाग, ग्रंथालय व शैक्षणिक विभाग यांच्यासाठी अत्यावश्यक शैक्षणिक व वैज्ञानिक उपकरणे, विविध यंत्रसामुग्री इ. ची खरेदीच्या अनुषंगाने उर्वरित निधी रु.२,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त) एवढा निधी पुढील अटींच्या अधिन वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

१. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात नमूद केलेल्या अटींचे पालन करण्याची जबाबदारी विद्यापीठाची राहील.
२. प्रशासकीय किंमतीच्या मर्यादेतच खर्च भागविण्याची जबाबदारी सर्वस्वी विद्यापीठाची राहील.
३. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा.
४. विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. सदरहू रक्कमेचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

६. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

२. सदरहू मंजूर झालेली तरतूद तातडीने डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे विद्यापीठास उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.
३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या संस्थेचा विकास (२२०२ ०९१४), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, नियोजन व वित्त विभागाचा अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.१३०/१४७१, दि.२८.०२.२०२४ व अनौपचारिक संदर्भ क्र.३५५/२०२४/व्यय-५, दि.११.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१५२१४८४२६५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2024.03.15 21:57:44 +05'30'

**( अजित बाविस्कर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. कुलगुरू, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे.
३. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.(५ प्रती)
६. उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

७. कुलसचिव, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
९. उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. महालेखापाल, (लेखापरीक्षा) -१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१४. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
१५. निवडनस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.